**सन २०२५-२६ करिता वनामती व रामेती संस्थांना, लेखाशिर्ष - २४०१ ४२५८ (अनिवार्य) - ३६ - सहाय्यक अनुदाने (वेतन) अंतर्गत रु. २३२.३५७७० लक्ष इतके अनुदान उपलब्ध करुन देण्याबाबत..**

**महाराष्ट्र शासन**
**कृषि, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः संकीर्ण-२०२५/प्र.क्र.६२/३-अे**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक
मंत्रालय, मुंबई ४०००३२
दिनांक : २८ एप्रिल, २०२५

वाचा -

१) वरिष्ठ प्रशासन अधिकारी नि लेखा अधिकारी, वनामती, नागपूर यांचे पत्र क्र.वनामती/लेखा-१ /अनु.मा./१०८९/२०२५, दि.३.०४.२०२५
२) वित्त विभाग शासन परिपत्रक क्र. अर्थसं-२०२५/प्र.क्र.४४/अर्थ-३,दि.०७.०४.२०२५

प्रस्तावना –

राज्यातील कृषि विकास कार्यक्रमाचे महत्व लक्षात घेऊन कृषि विभागातील तसेच कृषि विकासाशी संबंधित अधिकाऱ्यांना व कर्मचाऱ्यांना अदयावत प्रशिक्षण देण्याचे उद्दीष्ट लक्षात घेऊन नागपूर येथे वसंतराव नाईक राज्य कृषि विस्तार व्यवस्थापन प्रशिक्षण संस्था सुरु करण्यात आली आहे. सदरहू संस्था ही राज्यातील शिखर प्रशिक्षण संस्था म्हणून घोषित करण्यात आली असून नागपूर, पुणे, छत्रपती संभाजीनगर, अमरावती, नाशिक, कोल्हापूर व खोपोली येथील सात रामेती या शिखर प्रशिक्षण संस्थेच्या संलग्न कृषि व्यवस्थापन प्रशिक्षण संस्था (रामेती) म्हणून घोषित करण्यात आल्या आहेत.

वसंतराव नाईक राज्य कृषि विस्तार व्यवस्थापन प्रशिक्षण संस्था, (वनामती), नागपूर ही महाराष्ट्र शासनाचे अधिकारी व कर्मचारी यांना प्रशिक्षण देणारी एक अग्रगण्य स्वायत्त संस्था आहे. या प्रशिक्षण संस्थेमध्ये महाराष्ट्र शासनाचे गट-ब अधिकारी व गट-क कर्मचारी यांचे प्रशिक्षण कार्यक्रम घेतले जातात व प्रशिक्षणाशी संबंधित सर्व कामे केली जातात.

सन २०२५-२०२६ या वित्तीय वर्षाकरिता वनामती व अधिनस्त रामेती अंतर्गत अधिकारी/कर्मचारी यांचे वेतन लेखाशिर्ष २४०१ ४२५८ (३६) वेतन मध्ये रू.४,५१,०४,७३० इतके अनुदान उपलब्ध करुन देणेबाबतचा प्रस्ताव वरिष्ठ प्रशासन नि लेखा अधिकारी, वनामती, नागपूर यांनी संदर्भाधीन दि.३.०४.२०२५ च्या पत्रान्वये सादर केला आहे.

सन २०२५-२६ करिता वनामती व तिच्या सात संलग्न रामेती संस्थांकरिता, लेखाशिर्ष-२४०१ ४२५८ (अनिवार्य) - ३६ - सहायक अनुदाने (वेतन) अंतर्गत रु.१३६६.८१ लक्ष इतकी तरतूद करण्यात आलेली आहे. या तरतूदीतून लेखाशिर्ष-२४०१ ४२५८(अनिवार्य)-३६ - सहायक अनुदाने (वेतन) अंतर्गत रु.२३२.३५७७० लक्ष इतके अनुदान आयुक्त (कृषि) यांना उपलब्ध करुन देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. त्यानुसार शासन पुढीलप्रमाणे निर्णय घेत आहे.

**शासन निर्णय :-**

१. वसंतराव नाईक राज्य कृषि विस्तार व्यवस्थापन प्रशिक्षण संस्था, नागपूर व तिच्या सात संलग्न संस्थांना सन २०२५-२०२६ या वित्तीय वर्षाकरिता वनामती व अधिनस्त रामेती अंतर्गत अधिकारी/कर्मचारी यांचे वेतन करिता रू.२३२.३५७७० लक्ष (अक्षरी रुपये दोन कोटी बत्तीस लक्ष पस्तीस हजार सातशे सत्तर फक्त) इतके अनुदान आयुक्त (कृषि) यांना उपलब्ध करुन देण्यास मान्यता देण्यात येत आहे.

२. याप्रित्यर्थ होणारा खर्च सन २०२५-२६ मध्ये मंजूर केलेल्या अनुदानातून खालील लेखाशिर्षाखाली करण्यात यावा.

मागणी क्रमांक- डी-३
२४०१,पीकसंवर्धन
१०९,विस्तार व प्रशिक्षण
(०१) (४६) वसंतराव नाईक राज्य कृषि विस्तार व्यवस्थापन प्रशिक्षण संस्था,नागपूर व तिच्या सात संलग्न संस्थांना सहाय्यक अनुदान (अनिवार्य)
(दत्तमत) (२४०१ ४२५८)
३६, सहाय्यक अनुदान (वेतन)

३. सदरचा निधी खर्च करतांना महाराष्ट्र अर्थसंकल्पीय नियम पुस्तिका व वित्तीय अधिकार नियम पुस्तिकेमध्ये उल्लेख केलेल्या तसेच वित्त विभागाने निर्गमित केलेल्या मार्गदर्शक सूचना व प्रचलित अटी व शर्तीचे व वेळोवेळी दिलेल्या सूचनांचे काटेकोरपणे पालन करावे.

४. या शासन निर्णयाद्वारे वितरीत करण्यात आलेल्या रक्कमेचे कोषागारातून आहरण व वितरण करण्याकरिता पुढील अधिका-यांना नियंत्रण तसेच आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे.

| अ.क्र. | स्तर | नियंत्रण अधिकारी | आहरण व संवितरण अधिकारी |
|---|---|---|---|
| १. | आयुक्तालय स्तर | आयुक्त (कृषि), कृषि आयुक्तालय, पुणे | सहाय्यक संचालक (लेखा-१), कृषी, आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे. |
| २. | वनामती स्तर | संचालक वनामती,नागपूर | वनामती नागपूर कार्यालयातील वरिष्ठ प्रशासन नि .लेखा अधिकारी. |

५. सदर शासन निर्णय वित्त विभाग परिपत्रक क्र.अर्थसं-२०२५/प्र.क्र.४४/अर्थ-३, दि.७.०४.२०२५ च्या अधिकारानुसार निर्गमित करण्यात येत आहे.

६.	सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२५०४२८१७३०१८९२०१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

VISHAL DATTATRAY TEKE

Digitally signed by VISHAL DATTATRAY TEKE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=AGRICULTURE AND ADF DEPARTMENT, 2.5.4.20=b1a35a7424e4c5b594d9cb1798ac47cf07d8f7d496693efc58a7720a5cdafc92, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=8EB1C9B88DDF43C0CCD87A95BD631AD3EE730CDB839A8115F112376617EAE32F, cn=VISHAL DATTATRAY TEKE
Date: 2025.04.28 17:31:41 +05'30'

**(विशाल टेके)**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रत-**

१. प्रधान सचिव (कृषि), कृषि व पदुम विभाग,मंत्रालय,मुंबई
२. आयुक्त (कृषि ), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे,
३. संचालक, वसंतराव नाईक राज्य कृषि विस्तार व्यवस्थापन प्रशिक्षण संस्था,नागपूर
४. संचालक ( आत्मा ), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे
५. सर्व संचालक / सर्व सहसंचालक, कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे
६. महालेखापाल, महाराष्ट्र-१/२, (लेखा व अनुज्ञेयता /लेखा परीक्षा), मुंबई / नागपूर,
७. सर्व विभागीय कृषी सह संचालक,
८. कृषि सह संचालक ( विस्तार), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे
९. सर्व जिल्हा अधिक्षक कृषी अधिकारी,
१०. प्राचार्य, सर्व रामेती, महाराष्ट्र राज्य, पुणे ( पुणे, कोल्हापूर, छत्रपती संभाजीनगर, अमरावती, नाशिक, नागपूर व खोपोली )
११. सहसंचालक, लेखा व कोषागारे (संगणक कक्ष), नवीन प्रशासन भवन, मुंबई,
१२. वित्त विभाग (व्यय-१ / अर्थसंकल्प-१२), मंत्रालय, मुंबई-३२
१३.कार्यासन २-अे, कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
१४.निवड नस्ती ३-अे